**महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ अंतर्गत**
**प्राप्त झालेल्या अर्जांची/अपीलांची माहिती पाठविणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : ममाअ-२००२/प्र.क्र.१२७/०२/५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३/११/२००४

वाचा :- शासन परिपत्रक, क्रमांक : ममाअ-२००२/प्र.क्र.१२७/०२/५, दिनांक २४.६.२००४

**शासन परिपत्रक :-**

"महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" च्या अंतर्गत सर्व शासकीय माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी यांच्याकडे प्राप्त झालेल्या अर्जांवर /अपीलांवर संबंधितांकडून करण्यात आलेल्या कार्यवाहीची माहिती विहित विवरणपत्रात प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपूर्वी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे सादर करण्याबाबत उपरोक्त दि.२४.६.२००४ च्या शासन परिपत्रकान्वये सर्व संबंधितांना सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, बऱ्याच शासकीय माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी यांच्याकडून त्यांच्याशी संबंधित माहिती जिल्हाधिकारी कार्यालयाकडे विहित वेळेत पाठविण्यात येत नसल्याचे शासनाचे निदर्शनास आले आहे. तसेच ज्यांच्याकडून माहिती पाठविण्यात येते त्या माहितीमध्ये ज्या कालावधीची माहिती पाठविण्यात आली आहे त्या कालावधीत प्राप्त झालेल्या अर्ज/अपीलांचीच माहिती असते. उदा.'सप्टेंबर २००४' या महिन्याचा अहवाल पाठविताना फक्त सप्टेंबर महिन्यात प्राप्त झालेल्या अर्जांची माहिती पाठविण्यात येते. या अहवालाच्या कालावधीच्या पूर्वी संबंधितांकडे पूर्वीपासून प्रलंबित असलेल्या अर्जांची /अपीलांची आकडेवारी विचारात घेतली जात नसल्याचेसुद्धा निदर्शनास आले आहे. त्यामुळे या अधिनियमाच्या अंमलबजावणीचा आढावा घेताना अडचणी येत आहेत.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन सर्व संबंधितांना आता असे कळविण्यात येते की, त्यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेल्या अर्ज/अपीलांवर करण्यात आलेल्या कार्यवाहीची माहिती कोणत्याही परिस्थितीत प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपूर्वी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे विहित विवरणपत्रात सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच अशी माहिती पाठविण्याच्या दिनांकापर्यंत त्यांच्याकडे पूर्वीपासून प्राप्त व प्रलंबित असलेल्या सर्व अर्जांचा /अपीलांचासुद्धा त्यात समावेश करून cumulative माहिती पाठवावी. तसेच सर्व मंत्रालयीन विभागांनीसुद्धा या सूचना विचारात घेऊन त्यांच्या विभागाची (फक्त मंत्रालयीन स्तराची ) माहिती प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपूर्वी सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वंदना कृष्णा)
शासनाचे सचिव

प्रत :-

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
*७) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
*९) महाप्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*१०) महाप्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व महानगरपालिका आयुक्त,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सर्व मंत्रालयीन विभाग, व सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
*१९) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे-४११ ००७
२०) सा.प्र.वि./का.३९ यांना शासनाच्या अधिकृत वेबसाईटवर व इंट्रानेटवरील सा.प्र.वि.च्या साईटवर प्रसिद्ध करण्याकरीता.
*२१) राज्य स्तरीय परिषदेचे सर्व सदस्य.
२२) निवड नस्ती. (२ प्रती)

* (पत्राने)

---